उल्हासनगर महानगरपालिका क्षेत्रातील अनधिकृत विकास काम नियमाधीन करताना आकारावयाच्या भोगवटामुल्य निश्चितीबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बैठक-२७२२/१३/प्र.क्र.२५९/ज-४**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, पहिला मजला,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- १४ मार्च, २०२४.

**संदर्भ:-** १) जिल्हाधिकारी ठाणे यांचे पत्र क्र.महसूल/कक्ष-१/टे-१४/बा.को.न .F१६८३ ८८३८ ४६०५४, दिनांक २०.०७.२०२३

२) शासन अधिसुचना क्र.टिपीएस-१२१९/२१७२/प्र.क्र.११०/१९/नवि-१२, दिनांक १७.०२.२०२३

**प्रस्तावना**:-

उल्हासनगर शहर हे मुख्यतः फाळणीनंतर पश्चिम पाकिस्तानातून स्थलांतरित झालेल्या ज्या निर्वासितांचे किंवा विस्थापितांचे येथे पुनर्वसन करण्यात आले, त्यांच्यासाठी असलेले शहर आहे. अफाट वाढलेली लोकसंख्या आणि मर्यादित तलपृष्ठ निर्देशांक (FSI) असलेले क्षेत्र, लोभी व नियमांची पायमल्ली करणारे बिल्डर्स यांच्यामुळे शहरात मोठ्या प्रमाणात बेकायदेशीर बांधकामे केली गेली आहेत. सदर अनधिकृत बांधकामे निष्कासित केल्यास तेथील बहुसंख्य रहिवासी बेघर होतील आणि त्या विस्थापित लोकांना पर्यायी जागा देणेही शक्य होणार नाही. या कारणाने पश्चिम पाकिस्तानातून स्थलांतरित झालेल्या या व्यक्ती पुन्हा एकदा विस्थापित होतील आणि पुन्हा एकदा त्यांचे पुनर्वसन करावे लागेल. तसेच सद्यस्थितीत उल्हासनगर मधील बेकायदेशीर बांधकामे कोसळण्याच्या स्थितीत असून त्यामुळे जिवीत हानी होण्याची शक्यता नाकारता येत नाही. त्याअनुषंगाने उल्हासनगर शहरातील अनधिकृत बांधकामे नियमित करण्याच्या अनुषंगाने आकारावयाच्या शासकीय जागेचे भोगवटामुल्य निश्चीत करण्यासाठी जिल्हाधिकारी, ठाणे यांनी प्रस्ताव सादर केला होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने केवळ उल्हासनगर महानगरपालिका क्षेत्रातील अनधिकृत विकास कामे नियमाधीन करताना आकारावयाच्या भोगवटामुल्य निश्चिती करण्याचा प्रस्ताव दिनांक ११.०३.२०२४ रोजीच्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत सादर करण्यात आला होता. सदर बैठकीत प्रस्तुत विषयाबाबत झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने केवळ उल्हासनगर महानगरपालिका हद्दीतील शासकीय जमिनीवरील अनधिकृत विकास कामे नियमित करण्याच्या अनुषंगाने आकारावयाच्या भोगवटामुल्य निश्चितीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

प्रस्तुत प्रस्तावाच्या अनुषंगाने दिनांक ११.०३.२०२४ रोजीच्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

केवळ उल्हासनगर महानगरपालिकेच्या हद्दीतील शासनाच्या जमिनीवरील करण्यात आलेले अनधिकृत विकास काम नियमाधीन करण्याच्या बाबतीत भोगवटादाराला (वहिवाटदाराला) जिल्हाधिकारी, ठाणे यांच्यावतीने उपविभागीय अधिकारी, उल्हासनगर भाग, उल्हासनगर यांना प्रचलित शिघ्रसिद्धगणकाच्या सरसकट १० टक्के दराने जमिनीचे भोगवटा शुल्क निर्धारित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१२४००२५७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरिने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=d36a0a6455652c60ea76104dd537113a9ca67ab14a315b9cefc36fc9be2915f8, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2024.03.14 12:49:34 +05'30'

**( अजित देशमुख )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
८. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
९. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई -३२.
११. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१२. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विकाअ/ स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई -३२.
१३. अपर मुख्य सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव , मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
१७. जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे .
१८. जिल्हाधिकारी, ठाणे, जिल्हा ठाणे.
१९. आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका, उल्हासनगर
२०. उपविभागीय अधिकारी, उल्हासनगर भाग, उल्हासनगर
२१. मा.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(१) मुंबई -३२.
२२. मा.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(२) नागपूर.
२३. निवडनस्ती, कार्यासन ज-४, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.